**प्राथमिक शिक्षण संचालनाकडील ई- गव्हर्नस अंतर्गत विविध प्रकल्पांसाठी घेण्यात आलेल्या सेवांसाठी खर्च करण्यात आलेली रक्कम उपलब्ध करुन घेण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: ईगव्ह-०३२३/प्र.क्र.०७/ संगणक**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तारीत इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २८ मार्च, २०२४.

**वाचा:-**

आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्र. आशिक/२०२४/सीडॅकएसएमएस/ईगव्ह-१४३/२०९९, दि.२१.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

प्राथमिक शिक्षण संचालनालयाकडील ई-गव्हर्नन्स अंतर्गत विविध प्रकल्पांसाठी SMS, google map, Mahaonline इत्यादी सेवा तातडीची निकडकरिता घेण्यात आल्या आहेत. तसेच सदर सेवांसाठीचा खर्च प्रधानमंत्री पोषणशक्ती निर्माण योजनेच्या व्यवस्थापन सनियंत्रण व मूल्यमापन निधीमधून (MME) केला आहे. सदर सेवा एप्रिल, २०१७ ते २०१९ या कालावधीत घेण्यात आल्या आहेत. त्याअनुषंगाने, आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधिन पत्रान्वये देय असलेली एकूण रु ४,८७,३६३/- रक्कम वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे. तसेच, पवित्र प्रणालीतर्गत पवित्र प्रणाली, आरटीई २५% प्रवेश, शालार्थ प्रणाली इत्यादी पोर्टल अंतर्गत देण्यात येणा-या विविध सेवांसाठी सीडॅक यांचेकडील एसएमएसची सुविधा घेण्यात आलेली आहे. त्यानुसार, सदर सेवांसाठी ईएसएमएस सीडेंक या संस्थेकडून खरेदी करण्यासाठी रु.२,६७,८६०/- एवढे शुल्क चालू आर्थिक वर्षात प्राथमिक संचालनालयाकडून अदा करण्यात आलेले आहे. त्याअनुषंगाने, शिक्षण संचालक, प्राथमिक यांना रु ४,८७,३६३/- + रु.२,६७,८६०/- अशी एकूण रु ७,५५,२२३/- इतकी तातडीची निकडकरिता येणाऱ्या खर्चाची रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

ई-गव्हर्नन्स अंतर्गत विविध प्रकल्पांसाठी SMS, google map, Mahaonline इत्यादी सेवा तातडीची निकडकरिता घेण्याकरिता आलेल्या एकूण रु ७,५५,२२३/- (एकूण सात लाख पंचावन्न हजार दोनशे तेवीस रु) एवढ्या खर्चास व सदर रक्कम शिक्षण संचालक (प्राथमिक) यांना अदा करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८०-सर्वसाधारण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम (२२०२H४५४) ३१ सहाय्यक अनुदाने या

लेखाशिर्षातून सन २०२३-२४ च्या उपलब्ध तरतुदीमधून भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक व सहायक संचालक, (लेखा) माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका २०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग- २ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४३४/व्यय-५, दिनांक २६.०३.२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२८१६३८११२९२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK GULABRAO SAPKAL

Digitally signed by VIVEK GULABRAO SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=55c54ce6c9bede7daecd096d20450a76c60783cb1318374f8764a2da64d548a5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50EDF35541F970C25C79ED803C981C8C9EBC19E27CDBAD124BB5C63AA9962A6B, cn=VIVEK GULABRAO SAPKAL
Date: 2024.03.28 16:47:38 +05'30'

**( विवेक सपकाळ )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा.अ.मु.स. वित्त विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२) मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३) मा. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर१/२.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर१/२.
८) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
९) निवडनस्ती/संगणक कार्यासन.